**नागपूर-मुंबई शिघ्रसंचार द्रुतगती मार्ग (महाराष्ट्र समृद्धी महामार्ग) यावर स्थापित करावयाच्या नवनगरांकरिता महाराष्ट्र महामार्ग अधिनियमानुसार जमीन एकत्रीकरण योजनेत समाविष्ट करावयासाठी उद्देशीत असलेल्या अनुसूचित क्षेत्रातील जमिनीबाबत विचारविनिमय करण्यासाठी प्राधिकृत अधिकारी नियुक्तीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र.खाक्षेस-२०१६/प्र.क्र.२५१(एल.बी. ५५)/रस्ते-८,**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०२ फेब्रुवारी, २०१९.

**प्रस्तावना :-**

नागपूर-मुंबई शिघ्रसंचार द्रुतगती मार्ग (महाराष्ट्र समृद्धी महामार्ग) प्रकल्प हा राज्य शासनाचा महत्वाकांक्षी प्रकल्प आहे. सदर प्रकल्पाकरिता महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ मर्यादित ही "कार्यान्वयीन यंत्रणा" आहे. शासनाने सदर द्रुतगती मार्गावर २४ ठिकाणी नवनगरे (कृषी समृद्धी केंद्रे) स्थापित करण्याचा निर्णय घेतला आहे. त्यानुषंगाने महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ च्या कलम ११३ मधील तरतुदीनुसार सदर द्रुतगती मार्गावरील १७ ठिकाणी स्थापित करावयाच्या नवनगरांकरिता जागा अधिसूचित करण्यात आल्या आहेत व त्याकरिता महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ मर्यादित यास "नवनगर विकास प्राधिकरण" म्हणून घोषित केले आहे.

महाराष्ट्र महामार्ग (सुधारणा) अधिनियम, २०१६ च्या प्रकरण तीन-अ मधील जमीन एकत्रीकरण योजनेच्या तरतुदीनुसार सदर नवनगराकरिता अधिसूचित जमीन जमीन मालक किंवा हितसंबंधित व्यक्ती यांच्या जमीन एकत्रीकरण योजनेतील ऐच्छिक सहभागाबाबत संमतीद्वारे प्राप्त करण्याची तरतूद आहे. महाराष्ट्र महामार्ग (जमीन एकत्रीकरण योजना तयार करणे व तिची अंमलबजावणी करणे) नियम, २०१६ च्या नियम ४ मध्ये अनुसूचित क्षेत्रात येत असलेल्या जमिनीकरिता कार्यपद्धती विहित केली आहे. त्यानुसार उप-नियम (१) मध्ये "योजनेत समाविष्ट करावयाची उद्देशित असलेली जमीन अनुसूचित क्षेत्रात स्थित असेल तर, सक्षम प्राधिकारी, योजनेचा आपला उद्देश घोषित करण्यापूर्वी, पंचायतीसंबंधीचे उपबंध (अनुसूचित क्षेत्रांवर विस्तारित करणे) अधिनियम, १९९६ (१९९६ चा अधिनियम क्रमांक ४०), महाराष्ट्र ग्राम पंचायत अधिनियम (१९५९ चा ३) आणि महाराष्ट्र ग्राम पंचायतीसंबंधीचे उपबंध अनुसूचित क्षेत्रांवर विस्तारित करण्याबाबत नियम, २०१४ यांमध्ये तरतूद केलेली असेल अशा रीतीने तो तोडून पाहिल." अशी तरतूद आहे.

ठाणे व नाशिक जिल्ह्यामध्ये सदर द्रुतगती मार्गावर स्थापित करावयाच्या नवनगरांच्या अधिसूचित जमिनीपैकी काही जमीन अनुसूचित क्षेत्रात अंतर्भूत आहे. सदर बाब विचारात घेऊन, महाराष्ट्र महामार्ग (सुधारणा) अधिनियम, २०१६ व महाराष्ट्र महामार्ग (जमीन एकत्रीकरण योजना तयार करणे व तिची अंमलबजावणी करणे) नियम, २०१६ यातील तरतुदीनुसार नागपूर-मुंबई शिघ्रसंचार द्रुतगती मार्ग (महाराष्ट्र समृद्धी महामार्ग) यावर स्थापित करावयाच्या नवनगरांकरिता जमीन एकत्रीकरण योजनेत अनुसूचित क्षेत्रातील जमीन समाविष्ट करावयाचा उद्देश घोषित करण्यापूर्वी, पंचायतीसंबंधीचे उपबंध (अनुसूचित क्षेत्रांवर विस्तारित करणे) अधिनियम, १९९६ (१९९६ चा अधिनियम क्रमांक ४०), महाराष्ट्र ग्राम पंचायत अधिनियम (१९५९ चा ३) आणि महाराष्ट्र ग्राम पंचायतीसंबंधीचे उपबंध अनुसूचित क्षेत्रांवर विस्तारित करण्याबाबत नियम, २०१४ यातील

तरतुदीनुसार संबंधित ग्रामसभा / पंचायती, पंचायत समिती व जिल्हा परिषदेबरोबर विचारविनिमय करण्यासाठी राज्य शासनाच्या वतीने अपर जिल्हाधिकारी, ठाणे यांना ठाणे जिल्ह्याकरीता व अपर जिल्हाधिकारी, नाशिक यांना नाशिक जिल्ह्याकरीता प्राधिकृत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र महामार्ग (सुधारणा) अधिनियम, २०१६ व महाराष्ट्र महामार्ग (जमीन एकत्रीकरण योजना तयार करणे व तिची अंमलबजावणी करणे) नियम, २०१६ यातील तरतुदीनुसार नागपूर-मुंबई शिघ्रसंचार द्रुतगती मार्ग (महाराष्ट्र समृद्धी महामार्ग) यावर स्थापित करावयाच्या नवनगरांकरिता जमीन एकत्रीकरण योजनेत अनुसूचित क्षेत्रातील जमीन समाविष्ट करावयाचा उद्देश घोषित करण्यापूर्वी, पंचायतीसंबंधीचे उपबंध (अनुसूचित क्षेत्रांवर विस्तारित करणे) अधिनियम, १९९६ (१९९६ चा अधिनियम क्रमांक ४०), महाराष्ट्र ग्राम पंचायत अधिनियम (१९५९ चा ३) आणि महाराष्ट्र ग्राम पंचायतीसंबंधीचे उपबंध अनुसूचित क्षेत्रांवर विस्तारित करण्याबाबत नियम, २०१४ यातील तरतुदीनुसार संबंधित ग्रामसभा / पंचायती, पंचायत समिती व जिल्हा परिषदेबरोबर विचारविनिमय करण्यासाठी राज्य शासनाच्या वतीने अपर जिल्हाधिकारी, ठाणे यांना ठाणे जिल्ह्याकरीता व अपर जिल्हाधिकारी, नाशिक यांना नाशिक जिल्ह्याकरीता प्राधिकृत अधिकारी म्हणून नियुक्त करण्यात येत आहे.

अपर जिल्हाधिकारी, ठाणे व अपर जिल्हाधिकारी, नाशिक या प्राधिकृत अधिकारी यांनी पंचायतीसंबंधीचे उपबंध (अनुसूचित क्षेत्रांवर विस्तारित करणे) अधिनियम, १९९६, महाराष्ट्र ग्रामपंचायत अधिनियम, महाराष्ट्र ग्रामपंचायती संबंधीचे उपबंध (अनुसूचित क्षेत्रांवर विस्तारित करण्याबाबत) नियम, २०१४ व याबाबत शासनाने वेळोवेळी पारित केलेले आदेश विचारात घेऊन कार्यवाही करावी.

महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ मर्यादित यांनी नागपूर-मुंबई शिघ्रसंचार द्रुतगती मार्ग (महाराष्ट्र समृद्धी महामार्ग) यावर स्थापित करावयाच्या नवनगरांची आखणी व त्या अनुषंगिक कागदपत्रे अपर जिल्हाधिकारी, ठाणे व अपर जिल्हाधिकारी, नाशिक यांना या कामकाजासाठी उपलब्ध करून द्यावीत.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१९०२०२१२४७००९७१८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramchandra Dattatraya Joshi

Digitally signed by Ramchandra Dattatraya Joshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a652e9f280742859802a83b556a9f74dc3563d2f7f6c6ec8ad7583e085375954, serialNumber=28ed86128cb7870459118bc13c79d0b0f7c8b12e32e9f6b4d4868b020cc9a511, cn=Ramchandra Dattatraya Joshi
Date: 2019.02.02 12:48:18 +05'30'

( रा. द. जोशी )
अवर सचिव (खा.र.१)

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.मंत्री (सार्वजनिक बांधकाम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा.मंत्री [सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम)] यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

५) मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा.मंत्री (आदिवासी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) मा.मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८) मा.राज्यमंत्री (सार्वजनिक बांधकाम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९) मा.राज्यमंत्री [सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम)] यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०) मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
११) मा.राज्यमंत्री (आदिवासी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१२) मा.राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१३) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय,मुंबई.
१४) अपर मुख्य सचिव (महसूल, मुद्रांक शुल्क व नोंदणी), मंत्रालय, मुंबई.
१५) प्रधान सचिव (आदिवासी विकास), मंत्रालय, मुंबई.
१६) प्रधान सचिव (ग्राम विकास), मंत्रालय, मुंबई.
१७) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ मर्यादित, वांद्रे, (प) मुंबई.
१८) विभागीय आयुक्त, कोकण व नाशिक.
१९) जिल्हाधिकारी, ठाणे व नाशिक.
२०) अपर जिल्हाधिकारी, ठाणे व नाशिक.
२१) सर्व मंत्रालयीन विभाग.
२२) निवडनस्ती (रस्ते-८), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.